संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर श्री. सुनिल बाळासो पाटील यांची सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब या पदावर सरळसेवेने नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्र. एफएसएल-०४१८/प्र.क्र.५१३ (१०)/पोल-४,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ०४ मार्च, २०२२

संदर्भ : १) कक्ष अधिकारी, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्रमांक-११६७/२१९२/आठ, दिनांक ०५.११.२०१८,
२) महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र./No:महासंचालक/गो/ ४८-४९/२०१९, दि. ०७.०६.२०१९,
३) गृह विभाग शासन निर्णय क्र. एम.आय.एस- १३१५/प्र.क्र-२३७/पोल-४, दिनांक ३०.०५.२०१५,
४) सामान्य प्रशासन, शासन निर्णय क्रमांक: एसआरव्ही-२०१८/व्ही.आय.पी.६७/प्र.क्र.२०७/कार्या.१२, दि.२८०५.२०१८,
५) गृह विभाग, शासन आदेश क्र. एफएसएल-०४१८/प्र.क.५१३/पोल-४, दि. ३०.०७.२०१९.

**प्रस्तावना :-**

महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य यांच्या अधिनस्त संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब [६ व्या वेतन आयोगानुसार रु. ९३००-३४८०० + ग्रेड पे रु.४४००/-] व [सुधारीत मॅट्रीक्समधील वेतनस्तर S-१५: ४१८००-१३२३०० या वेतनश्रेणीत ७ व्या वेतन आयोगानुसार] या वेतनश्रेणीतील पदे निर्माण करण्यात आली आहेत. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या उपरोक्त संदर्भाधिन दि.०५.११.२०१८ च्या पत्रान्वये एकूण ८२ उमेदवारांची त्यांच्या गुणवत्ताक्रमानुसार सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब या पदासाठी शासनास शिफारस करण्यात आलेली आहे. त्यापैकी ८१ उमेदवारांची नियुक्ती संदर्भ क्र.५ येथील शासन आदेशान्वये दि.३०.०७.२०१९ रोजी करण्यात आलेली आहे. सदर गुणवत्ता यादीतील गुणवत्ता क्र.६५ येथील श्री.सुनिल बाळासो पाटील या उमेदवाराचा अपंग प्रवर्गातील नियुक्तीबाबतचा प्रस्ताव शासनस्तरावर विचाराधीन होता.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शासनास शिफारस केलेल्या या शासन आदेशासोबतच्या **सहपत्र-अ** मधील नमूद अ.क्र.६५ येथील श्री.सुनिल बाळासो पाटील यांची नामनिर्देशानाने नियुक्ती न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या अधिनस्त प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, पुणे येथे परिविक्षाधीन सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब [६ व्या वेतन आयोगानुसार रु.९३००-३४८०० + ग्रेड पे रु.४४००/-] व [सुधारीत मॅट्रीक्समधील वेतनस्तर S-१५ : ४१८००-१३२३०० या वेतनश्रेणीत ७व्या वेतन आयोगानुसार] या पदावर स्थानापन्न नियुक्ती खालील नमूद केलेल्या अटी व शर्तीनुसार करण्यात येत आहे.

१) उपरोक्त संदर्भ क्र. ०४ मधील सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयातील सुचनेप्रमाणे श्री.सुनिल बाळासो पाटील यांनी सदर आदेश प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, विद्यानगरी, हंस भुग्रा मार्ग, कलिना, सांताक्रुझ (पूर्व), मुंबई- ४०० ०९८ येथे आवश्यक त्या सर्व मूळ कागदपत्रांसह हजर रहावे अन्यथा सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार पुढील आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

२) सदर नियुक्तीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी उमेदवारांना प्रवास भत्ता अनुज्ञेय नाही.

३) सदरहू उमेदवारास या आदेशान्वये नियुक्ती दिली असली तरी त्याची सेवाज्येष्ठता ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने निश्चित केलेल्या गुणवत्ता क्रमांकानुसार राहील.

४) सदरहू उमेदवारांना शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अंनियो १००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५ नुसार विहित केलेली परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजना लागू राहील.

५) सदर उमेदवाराचा परिविक्षाधीन कालावधी हा नियुक्तीच्या पदावर रुजू झाल्याच्या तारखेपासून २ वर्षाचा (प्रशिक्षण कालावधी धरून) राहील.

६) सदर पदासाठी विहित केलेले प्रशिक्षण त्यांना पूर्ण करणे बंधनकारक राहील.

७) उमेदवाराने परिविक्षाधीन कालावधीत विहित विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

८) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९ मार्च, २००३ अन्वये संगणक हाताळणी/वापराबाबतचे शासन मान्यताप्राप्त मूळ प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत विभागप्रमुखाकडे सादर करणे आवश्यक आहे.

९) सदर उमेदवाराने अधिवास प्रमाणपत्र, लहान कुटुंबाचे प्रमाणपत्र, दिव्यांग प्रमाणपत्र, शैक्षणिक अर्हता प्रमाणपत्रे मूळ स्वरूपात तात्काळ सादर करणे बंधनकारक राहील.

१०) दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधी किंवा त्यानंतर शासनाने विहित नियमानुसार वाढविलेला परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर त्यांची सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब या संवर्गात नियमित नेमणूक केली जाईल.

११) परिविक्षा कालावधीमध्ये [६ व्या वेतन आयोगानुसार रु.९३००-३४८०० + ग्रेड पे रु.४४००/-] व [सुधारीत मॅट्रीक्समधील वेतनस्तर S-१५ : रू.४१८००-१३२३०० या वेतनश्रेणीत ७ व्या वेतन आयोगानुसार] या वेतनश्रेणीत वेतन मिळेल. परिविक्षाधीन कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यावर पहिली वार्षिक वेतनवाढ देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-१३७०/डी, दिनांक १२.०४.१९७२ अनुसार देण्यात येईल. त्यांना नियमाप्रमाणे महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

१२) जर दोन वर्षाच्या कालावधीच्या आत किंवा वाढविलेल्या परिविक्षाधीन कालावधीमध्ये कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त करू शकले नाहीत आणि/किंवा विहित परीक्षा/चाचण्या उत्तीर्ण झाले नाहीत किंवा गैरवर्तणुकीबदद्ल दोषी आढळले किंवा शासकीय सेवेत अभियोग्य नसतील तर त्यांची सेवा सेमाप्त करण्यात येईल.

१३) नियमाप्रमाणे त्यांना विहित मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण व्हावे लागेल व सदर परिक्षा उत्तीर्ण न झाल्यास त्यानुसार योग्य ती कार्यवाही करण्यात येईल.

१४) उपरोक्त वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील गट-ब च्या अधिकाऱ्यांना लागू असलेले अन्य सेवाविषयक नियम त्यांना लागू होतील.

१५) श्री.सुनिल बाळासो पाटील यांची पदस्थापना सदर शासन निर्णयात दर्शविण्यात आलेल्या ठिकाणीच करण्यात येईल, तसेच उमेदवारांची ओळख पटविण्यासाठी छायाचित्र असलेले आधार कार्ड, मोटार ड्रायव्हींग लायसन्स अथवा अन्य वैध प्रमाणपत्रे यापैकी एकाच्या आधारे रूजू करून घेण्याबाबतची दक्षता संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०४१३०३०५४९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

YOGESH
MAHADEO GOSAVI

Digitally signed by YOGESH MAHADEO GOSAVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=409605c5c875f777d39cbf4ca29ce3d56c5c1d7c1ea54667614a049c47985d83,
pseudonym=62D617A4D7B024F9E251D4AEEDB670FC8D126498,
serialNumber=D910025DFF598286A45B3B22318E6C113E071B7C6E85F3D06BECDD5995FC1966, cn=YOGESH MAHADEO GOSAVI
Date: 2022.03.04 13:04:24 +05'30'

**( योगेश गोसावी )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग**

**प्रति,**

१. महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य , मुंबई
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
४. मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (गृह)/शहरे/ग्रामीण, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सा.प्र.वि.१२/सा.प्र.वि.१६-ब) मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८. उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, पुणे
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
**११.** जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२. **श्री.सुनिल बाळासो पाटील,**
**द्वारा** संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांचे मार्फतीने नोंदणीकृत डाकेने.